अर्थसंकल्पीय तरतुदींचे पुनर्वितरण मुख्य लेखाशिर्ष “४४०२, मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च”

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयूडी-२०१६/प्र.क्र.४५०/पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: ३० डिसेंबर, २०१६

**प्रस्तावना :-**

सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पात ४४०२ ११४८ या मुख्य लेखाशीर्षातर्गत ०२ मजुरी, या उप शीर्षाखाली रु. ३.०० लक्ष, ०३ अतिकालिक भत्ता या उप शीर्षाखाली रु.६.३० लक्ष आणि २४- पेट्रोल , तेल व वंगण या उपशीर्षाखाली रु.१००.०० लक्ष इतकी तरतूद भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेस मंजूर करण्यात आली आहे.

सन २०१६-१७ च्या सुधारीत चारमाही अंदाजपत्रकानुसार उपरोक्त तीनही उप शीर्षासाठी अनुक्रमे रु. ४.५० लक्ष, रु. ६.५८ लक्ष व रु.२८.२५ लक्ष इतक्या जादा अनुदानाची मागणी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेकडून करण्यात आली आहे. दरवर्षी मागणीपेक्षा कमी अनुदान मंजूर होत असल्यामुळे रोजंदारी कामाच्या मजुरीवरील देयके व अतिकालिक भत्त्याची देयके प्रलंबित रहात असल्यामुळे, ही देयके अदा करण्यासाठी तसेच पेट्रोल व इंधनाचे दरात वाढ होत असल्याने जादा अनुदानाची आवश्यकता आहे. सदर वाढीव खर्चासाठी आवश्यक असलेला निधी पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१५-१६ च्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अर्थसंकल्पातील उपलब्ध तरतुदींपैकी मागणी क्र. वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ४४०२ ११४८ या लेखाशीर्षाखालील ५२ यंत्र सामुग्री व साधन सामुग्री या उद्दिष्टांमध्ये होणारी बचत विचारात घेऊन रु. ३६.०० लक्ष इतका निधी याच लेखाशीर्षाखालील ०२ मजुरी, ०३ अतिकालिक भत्ता व २४- पेट्रोल, तेल व वंगण या उद्दिष्टांखालील वाढीव खर्चासाठी सोबतच्या विवरणपत्र क्र. १ व २ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पुनर्वितरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

संबंधित अधिकाऱ्यांनी विवरणपत्र क्र. १ व २ मधील स्तंभ क्र. ५ खाली दर्शविण्यात आलेल्या पुनर्वितरणानंतरच्या सुधारित तरतुदींची नोंद घेऊन सदर निधीच्या वितरणाबाबतची पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२३०१२४८३१४२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2016.12.30 17:49:53 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२. उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
३. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
४. उप अभियंता ( यां ), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / २ - नागपूर ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता )
६. वित्त विभाग ( व्यय - ३), मंत्रालय, मुंबई
७. कक्ष अधिकारी / लेखा अधिकारी, पापु-०१, पापु-०४, पापु-२०
८. निवड नस्ती (पापु-१५)

(शासन निर्णय क्र. बीयूडी-२०१६/प्र.क्र.४५०/पापु-१५, दि.३० डिसेंबर, २०१६)

**विवरणपत्र क्र. १**

वित्तीय वर्ष २०१६-१७ मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे पुनर्वितरण

( रुपये लक्ष )

| अ.क्र. | पुनर्वितरणामुळे घट (-) झालेले लेखाशिर्ष (मुख्य/ उप/ गौण व तपशीलवार) | पुनर्वितरणाचे वेळी उपलब्ध असलेले मंजूर अनुदान | पुनर्वितरणामध्ये घट होणारी रक्कम (-) | पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ४४०२ ११४८ ५२- यंत्र सामुग्री व साधन सामुग्री | ८५.०० | (-)३६.०० | ४९.०० | मागणी क्र. वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ५२ यंत्र सामुग्री व साधन सामुग्री या उद्दिष्टांमध्ये होणारी बचत विचारात घेऊन रु. ३६.०० लक्ष इतका निधी याच लेखाशिर्षाखालील ०२ मजुरी, ०३ अतिकालिक भत्ता व २४ पेट्रोल, तेल व वंगण या उद्दिष्टांखालील वाढीव खर्चासाठी पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देण्यात येत आहे. |
| | **एकूण** | ८५.०० | (-)३६.०० | ४९.०० | |

(शासन निर्णय क्र. बीयूडी-२०१६/प्र.क्र.४५०/पापु-१५, दि. ३० डिसेंबर, २०१६)

**विवरणपत्र क्र. २**

वित्तीय वर्ष २०१६-१७ मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे पुनर्वितरण

( रुपये लक्ष )

| अ. क्र. | पुनर्वितरणामुळे वाढ (+) झालेले लेखाशिर्ष (मुख्य/ उप/ गौण व तपशीलवार) | पुनर्वितरणाचे वेळी उपलब्ध असलेले मंजूर अनुदान | पुनर्वितरणामध्ये वाढ होणारी रक्कम (+) | पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ४४०२ ११४८ ०२ मजुरी | ८.०० | (+) ४.५० | १२.५० | मागणी क्र. वाय-६, मुख्य लेखाशीर्ष ४४०२, मृद व जलसंधारणावरील भांडवली खर्च, ५२ यंत्र सामुग्री व साधन सामुग्री या उद्दिष्टांमध्ये होणारी बचत विचारात घेऊन रु. ३६.०० लक्ष इतका निधी याच लेखाशिर्षाखालील ०२ मजुरी, ०३ अतिकालिक भत्ता व २४ पेट्रोल, तेल व वंगण या उद्दिष्टांखालील वाढीव खर्चासाठी पुनर्वितरणाने उपलब्ध करुन देण्यात येत आहे.. |
| २ | ०३ अतिकालिक भत्ता | ६.३० | (+)३.२० | ९.५० | |
| २ | २४ पेट्रोल , तेल व वंगण | १००.०० | (+) २८.३० | ५६.०६ | |
| | **एकूण** | **११४.३०** | **(+) ३६.००** | **७८.०६** | |